## गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ६ जुलै २००४

### अधिसूचना

**मुंबई मोटार वाहन कर अधिनियम, १९५८.**

क्रमांक एमटीए. १७०४/प्र.क्र.११/परि.-३.––मुंबई मोटार वाहने कर अधिनियम, १९५८ (१९५८ चा ६५) च्या कलम १३, पोट-कलम २, स्पष्टीकरण-२ खालील बाब क्रमांक ५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे, दि लेप्रेसी मिशन, ट्रस्ट इंडिया, नाशिक या संस्थेच्या मालकीचे वाहन क्रमांक एमएच-१५-के-३५०२ व एमएच-१५-एएच-२४९० या नोंदणी चिन्ह असलेल्या मोटार वाहनांचा केवळ धर्मादाय हेतूसाठी वापरण्यात येणार असल्याने, ते ही अधिसूचना निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ३ वर्षांकरीता किंवा सदर संस्थेकडून उक्त हेतूसाठी वापरण्याचे चालू असेल तोपर्यंत, त्यापैकी आधी जे घडेल त्या कालावधीपर्यंत करमाफी देण्यात यावयाचे वाहन म्हणून अधिसूचित करीत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**प्र. कृ. सगदेव,**
शासनाचे उप सचिव.

---

## गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३ जुलै २००४

### अधिसूचना

**मुंबई मोटार वाहन कर अधिनियम, १९५८.**

क्रमांक एमटीए. १७२००/प्र.क्र.६७/परि.-३.––मुंबई मोटार वाहने कर अधिनियम, १९५८ (१९५८ चा ६५) च्या कलम १३, पोट-कलम २, स्पष्टीकरण-२ खालील बाब क्रमांक ५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे, बजाज ऑटो लिमिटेड या कंपनीच्या मालकीचे वाहन क्रमांक एमएच-१४-३१५२ या नोंदणी चिन्ह असलेल्या मोटार वाहनांचा केवळ सार्वजनिक उपयुक्ततेच्या उद्दिष्टांची अभिवृद्धी हेतूसाठी वापरण्यात आले असल्याने, त्याचा दिनांक १७ डिसेंबर १९९९ ते २८ ऑगस्ट २००० पर्यंतच्या कालावधीसाठी करमाफी देण्यात यावयाचे वाहन म्हणून अधिसूचित करीत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**प्र. कृ. सगदेव,**
शासनाचे उप सचिव.

---

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई